सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाकरिता कृषि उन्नती योजना- एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान या योजनेंतर्गत केंद्र तसेच राज्य हिश्याचा निधी वितरीत करण्याबाबत.. (लेखाशिर्ष- २४०१ ए०२९ केंद्र हिस्सा आणि २४०१ ए०११ ( राज्य हिस्सा ) )

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१७ / प्र.क्र.११ / कार्यासन.६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- १८ ऑगस्ट, २०१७.

**वाचा -**

१) वि, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७ /प्र.क्र.६८ / अर्थ-३, दि. ०१.०४.२०१७.
२) वि. वि, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७ /प्र.क्र.७५ / अर्थ-३, दि. १८.०४.२०१७.
३) वि. वि, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७ /प्र.क्र.९४ / अर्थ-३, दि. ३०.०६.२०१७
४) केंद्र शासन, कृषि आणि शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्रमांक १८-२४/२०१७-MIDH, दिनांक ०९ जून, २०१७.
४) कृषि व पदुम विभाग, नस्ती क्र. राफअ- २०१७ / प्र. क्र. १२१ / ९-अे.

**शासन निर्णय-**

केंद्र पुरस्कृत कृषि उन्नती योजना, एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान या योजनेंतर्गत् अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी मागणी क्र.टी-५, २४०१, पीक संवर्धन, ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाति क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (०६) एकात्मिक फलोत्पादन विकासासाठी केंद्र पुरस्कृत अभियान ( ६० टक्के केंद्र हिस्सा) लेखाशिर्ष २४०१ ए०२९, ३३- अर्थसहाय्य या बाबीखाली रु. १०४३.८० लाख इतका निधी तर (०१)( ०७) एकात्मिक फलोत्पादन विकासासाठी केंद्र पुरस्कृत अभियान ( ४० टक्के राज्य हिस्सा) लेखाशिर्ष २४०१ ए०११, ३३- अर्थसहाय्य या बाबीखाली रु. ६९५.८६ लाख इतका निधी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाकरिता अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

२. केंद्र शासनाने सदरहू योजनेंतर्गत सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाकरिता पहिल्या हप्त्यापोटी रु.२२५.०० लाख इतका निधी वितरीत केला आहे. त्यास अनुसरुन कृषि व पदुम विभागाच्या वाचा क्र. ४ येथील प्रस्तावाच्या अनुषंगाने मागणी क्र.टी-५, २४०१, पीक संवर्धन, ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाति क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (०६) एकात्मिक फलोत्पादन विकासासाठी केंद्र पुरस्कृत अभियान ( ६० टक्के केंद्र हिस्सा) लेखाशिर्ष २४०१ ए०२९, ३३- अर्थसहाय्य या बाबीखाली रु. २२५.०० लाख ( अक्षरी रुपये दोन कोटी पंचवीस लाख फक्त ) इतका निधी तर त्यास समरुप राज्य हिश्याकरिता (०१)(०७) एकात्मिक फलोत्पादन विकासासाठी केंद्र पुरस्कृत अभियान ( ४० टक्के राज्य हिस्सा) लेखाशिर्ष २४०१ ए०११, ३३- अर्थसहाय्य या बाबीखाली रु. १५०.०० लाख ( अक्षरी रुपये एक कोटी पन्नास लाख फक्त ) इतका निधी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाकरिता प्रशासकीय विभाग / नियंत्रक अधिकारी म्हणून अपर मुख्य सचिव (कृषि), कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना वाचा क्र. १ व २ मधील अटी व शर्तीची पुर्तता करत असल्याने अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

३. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. नियंत्रण अधिकारी / विभागप्रमुख यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास; आदिवासी विकास विभाग व कृषि व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष ठेवता येईल.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाने **वाचा** येथील क्रमांक १ व क्रमांक २ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२७३/ अर्थोपाय, दि.२२-०६-२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८१८१०४२२४३९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Bhagwan Maruti Sawant

Digitally signed by Bhagwan Maruti Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8ee89eb0aec64f8bc0bdf8d85ddb4706d35abd8b73c618e114ee98d5c9ecf57b, cn=Bhagwan Maruti Sawant
Date: 2017.08.19 10:57:54 +05'30'

**भगवान सावंत**
अवर सचिव.

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव ( कृषि ) कृषि व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त, ( कृषि) , महाराष्ट्र राज्य.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.

५. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे, पालघर, रायगड, नाशिक, धुळे, नंदूरबार, अमरावती, यवतमाळ, नागपूर, गोंदिया, गडचिरोली, चंद्रपूर, नांदेड
७. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. कार्यासन क्र. २ व ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१०. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.